भर्तरीनाथांची जन्मकथा आणि काही काळ अरण्यातील हरिणीने आपल्या दोन पडसांसह मनुष्य योनीतल्या एका नवजात बालकाचे संगोपन मनाला चटका लावून गेले. विधीलीखितान्वये मृगमातेची आणि या बालकाची ताटातूट जयसिंग आणि रेणुका या भट दांपत्यामुळे झाली. त्यामागेही काही पूर्वसंचित आणि भविष्यातील विधायक घटनांच्या पूर्ततेसाठी तसे घडणे अपरिहार्य होते. भर्तरीचे शैशव ते तो पंधरा वर्षांचा होईपर्यंतचा काळ, साक्षात सूर्यनारायणाने एका दुर्घटनेप्रसंगी मनुष्यरुपात त्याला दिलेली भेट आणि रेणुका या भर्तरीच्या तथाकथित मातेकडे भर्तरीच्या जन्माचा खुलासा केला. भर्तरीचे जनकत्व माझे असले. तरी लैकिक अर्थाने हा तुमचा पुत्र आहे. तेव्हा तुम्ही उभयंता त्याचे ममतेने संगोपन करावे. कारण हा ईश्वरी अवतार आहे. पुढे भट दांपत्य माळवा देशात भर्तरीच्या वधुसंशोधनासाठी निघाले असता, मार्गातील घनदाट अरण्यात तस्करांच्या लुटमारीत जयसिंग मृत झाला. पती निधनाच्या दुःखवेगात रेणुकाही मृत झाली आणि भर्तरी पोरका झाला. मातापित्यांच्या शवांना अग्नी देऊन चितेवरील राखेकडे शून्य नजरेने पहात बसला. त्याला या अवस्थेतून व्यापारासाठी देशाटनास निघालेल्या व्यापारांच्या तांड्याने सावरले आणि स्वतःबरोबर नेले.

पुढे असे काही घडले की तो व्यापारी तांडा भर्तरीच्या समयसुचकतेमुळे मोठ्या आपत्तीतून विमुक्त झाला आणि भर्तरीचेही श्रेष्ठत्व सिद्ध झाले. अवंतिका नगरीजवळ व्यापाऱ्यांचा तांडा पोहोचला पण सुर्यस्त झाल्याने त्यांनी नगरी बाहेरच मुक्काम करायचे ठरविले. सर्वप्रथम त्यांनी निवाऱ्यासाठी राहुट्या उभारल्या. बैलांच्या पाठीवरील गोऱ्या उतरवून राहुट्यांमध्ये रचून ठेवल्या. काही वेळाने आसमंतात काळाकुट्ट अंधार पसरला, थंडीचा गारवा अंगावर शहारे निर्माण करू लागलाय. जेवण खाण आटोपून व्यापारी शेकोटी भोवती कोंडळे करून शेक घेत बसले आहेत. तेवढ्यात त्यांना कोल्हेकुईचा गोंगाट ऐकू आला. कोल्हे एकमेकांना सांगत होते, "या व्यापाऱ्यांनी आज असे बेसावध राहू नये कारण त्यांचावर दरोडा पडणार आहे. दरोडेखोर मौल्यवान सामान आणि द्रव्य लुटून नेतील म्हणून त्यांनी सावध राहुन प्रतिकाराची तयारी करावी." कोल्हेकुई ऐकून भर्तरीने विचार केला की, आपण या व्यापाऱ्यांच्या खाल्लेल्या मिठाला जागले पाहिजे, यांनीच माझे दुःख दूर केले आणि मला आधार दिला. तेव्हा त्यांच्या उपकाराची जाण ठेवून, त्यांना कोल्हेकुईचा अर्थ सांगणे हे आवश्याक आहे." मग तो व्यापाऱ्यांना म्हणाला, "वेश्यसज्जनहो! सावाध व्हा, आपल्यावर आज दरोडा पडणार आहे." त्यांनी पृच्छा केली की, "हे तुला कसे कळले?" भर्तरीने उत्तर दिले, "मला प्राण्यांची भाषा येत असल्यामुळे कोल्हेकुईचा अर्थ समजला. ते कोल्हे एकमेकांशी जंबूक भाषेत जे बोलले ते मी आपणास सांगितले. मी आपले अन्न खाल्ले असल्याने, आपले हित पाहणे, माझे कर्तव्य आहे." भर्तरीच्या बोलण्यावर विश्वास ठेवून व्यापारी सतर्क झाले आणि शस्त्रसज्ज होऊन बसले. मौल्यवान मालाच्या सुरक्षेसाठी पहारा देऊ लागले. भाकितानुसार काही वेळाने दरोडेखोरांनी व्यापाऱ्यावर हल्ला केला पण पूर्वकल्पना असल्यामुळे व्यापाऱ्यांनी तीव्र प्रतिकार केला दरोडेखोरांना जखमी करूनच पिटाळले. जीववार बेतलेल्या संकटातून, भर्तरीमुळे बचावलो, तरीसुद्धा पुन्हा हल्ल्याची शक्यता लक्षात घेऊन पहारा अधिक सावधपणा केला. रात्र उलटण्यास दीड प्रहर उरला असता, पुन्हा सर्वांना कोल्हेकुई ऐकू आली. व्यापाऱ्यांनी विचारले, "भर्तरी, आता कोल्हेकुई काय म्हणाली?" भर्तरी सांगू लागला, "उत्तर दिशेकडून दक्षिणेकडे एक पांथस्थ येत आहे. हा राक्षस असून त्याला श्री शिवाचे वरदान प्राप्त झालेले आहे. त्यांच्याजवळ तेजस्वी आणि दैदिप्यमान अशी चार रत्ने आहेत. त्या राक्षसाचा वध करून जो कुणी भाळावर त्याच्या रक्ताचा टिळक लावील तो

अवंतिकेचा सर्व सत्ताधीश होईल. राक्षसाचा रक्ताने वस्त्र भिजवून घ्यावे आणि राज नगर वेशीवर टिळा लावून स्वतःच्या भाळावर विजय टिळक लावावा, असे करणारा अवंतिका नगरीचा स्वामी होईल." विक्रम नावाचा एक पराक्रमी राजसेवक गुप्तपणे यांच्यावर लक्ष ठेवून होता. त्याने भर्तरीची ही भविष्यवाणी ऐकली आणि दृढ निश्चयाने कुणालाही न सांगता एकटाच हातांमध्ये नांगी समशेर घेऊन निधड्या छातीने राक्षसास गाठण्यासाठी निघाला.

तो राक्षस म्हणजे चित्रमा नावाचा गंधर्व होता. एकदा तो काही कामानिमित्त कैलासावर गेला. तेव्हा तेथे शिवपार्वती ध्युत खेळत बसले होते. चित्रमा गंधर्वाने दोघानांही नमन केले. महादेवाने त्याला जवळ बसविले आणि खोळंबलेला डाव पुन्हा सुरु झाला. खेळता खेळता पार्वतीने डाव जिंकला परंतू फाशाचे दान किती पडले यावरून शिवपार्वतीमध्ये वादंग सुरु झाले. श्रीशिव म्हणाले, "अठरा पडले." पार्वती म्हणायची, "नाही, बारा पडले." अशा प्रकारे दोघांचे एकमत होईना. मग त्या दोघांनी त्रयस्थ साक्षीदार म्हणून गंधर्वाला विचारले. तेव्हा त्याने शिवाची बाजू उचलून धरीत 'अठरा पडले' अशी खोटी साक्ष दिली. तेव्हा राग येऊन पर्वत्रीने शाप दिला, "चित्रमा गंधर्वा! श्रीशिवाचा पक्ष धरून तू धडधडीत खोटे बोललास म्हणून मृत्युलोकात तु राक्षस होऊन राहशील." पार्वतीमातेची शापवाणी कधीच असत्य होणार नसल्याने चित्रमा घाबरला, डोळ्यांत आश्रू आणून म्हणाला, "भोलेनाथ! मी आपला पक्ष धरून बोललो, म्हणून शापाचा धनी झालो. आता आपणच मला वाचवावे. मी आपल्या पायांशी शरण आलो आहे." त्याची कणव येऊन श्रीशिव म्हणाले, "चित्रमा! चिंता करू नकोस. पुढे इंद्राच्या शापाने सुरोचन गंधर्व मृत्युलोकात जाईल. त्याच्या पुत्राच्या हातून तुला मुक्ती मिळून तू पुन्हा स्वर्गप्राप्ती करशील." "महादेवा! मला मारून गंधर्व पुत्राचा काय फायदा होणार आहे? अकारण तो मला कशाला मुक्ती देईल?" या चित्रमाच्या शंकेला उत्तर देताना श्रीशिव म्हणाले, "गंधर्व! तुला मारून तुझ्या रक्ताचा टिळा कपाळावर लावल्यास तो राजा होणार असल्याने, तो तुला नक्कीच मुक्ती देईल." तरीही चित्रमाचे शंकानिरसन झाले नाहीच. तो म्हणाला, "परंतु हे त्याला कसे समजणार? त्याला ही माहिती कोण देईल?" श्रीशिव म्हणाले, "नवनाथांतील द्रुमिल नारायण अवतार भर्तरीनाथाच्या मुखातून, सुरोचन पुत्राला ही माहिती प्राप्त होईल." अशा प्रकारे शंका निरसन झाल्यावरच चित्रमा गंधर्वाने दिव्य देहाचा त्याग केला आणि राक्षस देहाने पृथ्वीवर आला. तोच हा राक्षस दक्षिणेकडे वाटचाल करीत आहे. श्रीशिवांनी चित्रमा गंधर्वाला उःशाप देताना सुरोचन पुत्राचा उल्लेख केला. मुळात सुरोचन गंधर्व कोण हा कथाभागही समजला पाहिजे.

एकदा देवराज इंद्राच्या दरबारात संगीत नृत्य सभा रंगली होती. सभेमध्ये गंधर्वादिक अनेक प्रतिष्ठितांची उपस्थिती होती. तिलोत्तमा आणि मेनका अशा रूपसंपन्न आणि लावण्यवती अप्सरा आपले नृत्य कौशल्य दाखवीत होत्या. त्यांच्या लावण्याचे वर्णन कसे करावे? साक्षात मदनालाही भोवळ यावी अशी मादकता त्यांच्या देहात आणि प्रकृतीत ठासून भरली होती. उग्र जपी, तपी, ऋषीमुनी त्यांच्या नयनबाणांनी आणि अंगविक्षेपांनी विरघळले जात होते. सुरोचन गंधर्वालाही काम भावना अनावर झाली आणि भर सभेत त्याने मेनकाचा हात धरून तिला कवेत घेण्याचा प्रयत्न केला. या घटनेने इंद्रसभा स्तब्ध झाली. त्याचे हे अगोचर वागणे उपस्थितांना रुचले नाही, रंगाचा भंग झाला. अत्यंत कोपिष्ट होऊन इंद्राने सुरोचानाची निर्भत्सना केली आणि शाप दिला. "या सभेतील संकेत मोडून, कामभावनेने हात धरून रसभंग करणाऱ्या अधम सुरोचना, या प्रमादबद्दल तुला मृत्युलोकात गाढवाच्या जन्म प्राप्त होईल. दूर हो माझ्या दृष्टी समोरून!" ही शापवाणी ऐकताच सुरोचानाची कामज्वराची धुंधी उतरली. तळयावर आलेल्या सुरोचन गंधर्वाने इंद्राची क्षमा मागितली. स्तुतीस्तवन करीत केविलवाणी विनंती करून उःशाप मागू लागला, तेव्हा त्याच्याविषयी कणव निर्माण

होऊन इंद्र म्हणाला, “मथुरा नगरीचा राजा सत्यवर्मा याच्या कन्येशी तुझा विवाह होऊन तुम्हाला विक्रमादित्य नावाचा पुत्र होईल. तो पुढे ‘विक्रम संवत’ शककर्ता, महापराक्रमी राजा होईल. अशा प्रकारे बारा वर्षांनी पुत्रसुख पाहताच तू गदर्भ त्यागून गंधर्व देहाने स्वर्गलोकी येशील.” उःशापाने संतुष्ट झालेला सुरोचन वायुवेगाने गरगरत सूक्ष्मरूपाने भूमीवर आदळला. मथुरा नागरीजवळ गाढव होऊन उकिरडा फुंकत इतर गाढवात मिसळला.

कमठ नावाचा कुंभार त्या गावात रहात होता. नित्यनियमाप्रमाणे आपली सर्व गाढवे हाकत त्याने घरी आणली, त्याचबरोबर हे नवीन गाढवसुद्धा कुंभारवाड्यात आले. या कमठाकडे अनेक दिवस माती वाहण्याचे काम त्याने केले. पुढे आर्थिक आपत्तीमुळे या कमठाने आपली सर्व गाढवे विकली आणि यालाच फक्त कामासाठी ठवले. एके दिवशी मध्यरात्री दोन प्रहरी ते गाढव मनुष्यवाणीत बोलले, “अहो, कमठ कुंभार! सत्यवर्मा राजाची सुंदर कन्या मला बायको करून दे.” कुंभार दचकून जागा झाला, कोण बोलले ते बाहेर येऊन पाहतो तर कुणीच दिसेना घरात जाऊन झोपताच पुन्हा जाग आली ती त्याच आवाजाने, “कमठ कुंभारा झोपतोस काय? सत्यवर्मा राजाची कन्या मला बायको करून दे.” कुंभाराने बाहेर येऊन पहिले तर कुणी नाही. गाढव मनुष्यवाणीत बोलेल अशी शंका ही येणे शक्य नाही. असे अनेक दिवस कुंभाराच्या झोपेत व्यत्यय येत होता, त्यमुळे तो त्रस्त झाला होता. एका रात्री याचा सोक्षमोक्ष लावलाच पाहिजे, असा मनाचा हिय्या करून तो बाहेरच बसून राहिला, तेव्हा गाढवाने त्याला जवळ बोलवून सांगितले, “कशाला इकडे तिकडे पाहताय? मीच तुम्हाला रोज हाका मारतो आहे, महाराज! सत्यवर्माची कन्या मला बायको करून द्या!” गाढव भलतेच काहीतरी बरळत असल्याचे जाणवून भयाने त्याची वाचाच बंद पडायचा वेळ आली. भीतीने थंडगार पडला मनात म्हणाला, “काय नाहक बला आहे? कुणी ऐकले आणि राजालाच सांगितले तर? राजा माझ्या हातपायात बेड्या ठोकून माझी रवानगी कारागृहातच करेल. माझे गाढव थेट राजघराण्याशी सोयरिक साधू पाहत आहे! कुणालाही क्षोभ होईल. कुठे राजा आणि कुठे रंक? कुठे मेरू पर्वत आणि कुठे मच्छर? सूर्य आणि काजवा अशी तुलना शक्य आहे काय? कुठे इंद्राचा ऐरावत आणि कुठे टांग्याला जुंपलेली तट्टाणी? कोणत्याही गुणांनी बरोबरी शक्य नाही. हा गाढव नको तेच बोलतो आहे, हा माझा घात करणार! हे काही रास्त नाही, राजाला हे कळून आपले मुंडके उडविले जाण्याच्या अगोदर ही नगरी सोडून गेले पाहिजे, तरच आपले प्राण वाचतील.” सूर्योदय होईपर्यंत तो विचार करून करून मेंदूला शिणवत होता. सकाळी सकाळीच त्याने पत्नीला गाढवाचा पराक्रम सांगितला आणि दोघांनी मिळून पलायनाची योजना नक्की केली.

खरे तर प्राणभयाने त्याची मती अशी काही गुंग झाली होती की त्या दोघांच्याही लक्षात येईना की पशु वाचाहीन असतात, त्यांना कधीही मनुष्यवाणीत विचार व्यक्त करता येणे शक्य नाही, हे गाढव मनुष्यवाणीत बोलत आहे, त्याअर्थी हे गाढव नसून हा काही तरी निराळा प्रकार आहे. गांगरलेल्या आणि भयभीत मनस्थितीत त्यांनी घरातील सामानांची गाठोडी बांधून त्याच गाद्वावर लादली आणि गाव सोडून पळून जाऊ लागले. गावाच्या वेशीतून बाहेर पडत असतांना पहारेकऱ्यांनी त्यांना हटकले, “काय हो कमठजी! संसार गाढवावर लादून कुठे पळून जात आहात? आणि कशासाठी? काय कारण घडले? कुंभाराची तर मती गुंग झाली काय कारण सांगावे, कळत नव्हते, कावरा बावरा होऊन पहारेकाऱ्याकडे पहात तो मूकस्तंभासारखा उभा राहिला. पहारेकरी प्रश्नांवर प्रश्न विचारीत आहेत. पण कमठ तोंड उघडण्यास तयार नाही. पहारेकऱ्यांनी त्याच्या संशयास्पद वागण्याबद्दल त्याला अटक केली. पहारेकरी म्हणाले, “काही कारण न सांगता नगरी सोडून पळून जात आहेस, मुक्याचे सोंग घेऊन संशयास्पद वर्तन करतोस. आता महाराजांना

भेट आणि मग त्यांच्याच परवानगीने जा. चला महाराजांकडे!” असे म्हणून त्याला महाराजांपुढे उभा केला. राजाने विचारले, “कमठ कुंभारा! या समृद्ध राजनगरीत तुला काही पिडा भोगावी लागली आहे काय? येथे समृद्धी नांदत असतांना तू ही नगरी सोडून का जातो आहेस? प्रजेचे पालनपोषण करण्यात माझ्याकडून काही कसूर तर होत नाही ना? मी नुसता नावाचाच सत्यवर्मा नसून माझा कारभारसुद्धा सत्य नेमानेच चालतो. तरी तुझ्यावर पलायनाची वेळ का आली त्याचे कारण कळू दे.” महाराजांच्या सौहार्दपणाने कमठ कुंभार काहीसा सावरला आणि नाईलाजाने बोलू लागला, “महाराज! आपण दयाळू प्रजापालक आणि प्रजाहितदक्ष राजे आहात. आपल्या राजकारभारात काही न्यून नाही. माझ्या पलायनाचे कारण मोठे विचित्र आहे. ते सांगितले तरी आणि न सांगितले तरी प्राण जाण्याची भिती मला आहे. मला अभय वचन मिळाल्यास मी सत्य सांगू शकेन.” कुंभाराच्या विनंती स्वीकार करीत महाराज म्हणाले, “प्राणहरणाची भिती वाटत असेल तर ती मनातून काढून टाक. मी तुझा गुन्हा माफ करून तुझे प्राणरक्षण करीन. हे माझे तुला अभय वचन आहे. निर्भयपणे सत्य सांग.” हे आश्वासन मिळाल्यावरही कुंभार म्हणाला, “अभयाबद्दल फार उपकार झाले, महाराज! परंतु गोष्ट उघडपणे सांगण्यासारखी नसल्याने आपण एकांतात चलावे.” “अवश्य!” असं म्हणून महाराज त्याच्यासह एकांत स्थानी गेले. तेव्हा कमठ सांगू लागला, “महाराज! कसं सांगू तुम्हाला! माझ्या घरी एक गाढव आहे. ते रोज रात्री मला सांगते की ‘महाराज सत्यवर्माच्या कन्येशी माझे लग्न लावून दे’ चक्रवर्ती महाराज! गाढवाच्या या मागणीने मी फार घाबरून गेलो आहे. आपणास हे समजले तर माझी धडगत नाही. या प्राणभयाने मी नगरी सोडून पळून चाललो होतो.” महाराज सत्यवर्मा विचारात पडले मनात म्हणू लागले, “गदर्भ हा वाचाहीन पशु आहे, पशु मनुष्यवाणीत बोलतो म्हणजे आश्चर्यच आहे. तो निश्चित पशु नसणार! कुणीतरी परमेश्वरी अवतारच असावा. त्याची पशुत गणना करणे गैर आहे. या प्रकारची सखोल चौकशी होणे आवश्यक आहे.” महाराज म्हणाले, “कमठा! आता मनामध्ये भय ठेवू नकोस, तू आपल्या गाढवासह परत घरी जा. रात्री त्याने पुन्हा तसे बोलणे केले की त्याला सांग, तुझे बोलणे राजाच्या कानावर घातले आहे, तथापि राजाची पण एक अट आहे. संपूर्ण मथुरा नगरी तांब्याची करून राजाला संतुष्ट केलेस तर तुला राजकन्या मिळू शकते असे उत्तर त्याला दे. नंतर तो काय म्हणतो ते मला येऊन सांग.” अशी कमठाला युक्ती सांगून त्याला स्वगृही परत पाठविले.

कमठ कुंभाराने आपल्या घरी येऊन पुन्हा संसाराची मांडणी केली. सूर्यास्त झाल्यानंतर रात्री दोन प्रहर उलटले. नेहमीप्रमाणे गदर्भाने कमठाला हाक मारली, “अहो कमठ कुंभार! राजा सत्यवर्माची कन्या मला बायको करून द्यावी.” क्षणात कमठ बाहेर येऊन म्हणाला, “गदर्भा! तुझे म्हणणे महाराजांच्या कानावर घातले आहे. परंतु त्यांची एक अट आहे, जर तू संपूर्ण मथुरा नगरी तांब्याची धातूची करून दिलीस तरच ते कन्या देण्यास राजी होतील. अन्यथा नकार समज. आता तुझ्या अंगात जर कला कसब असेल तर ती दाखव आणि राजाची मर्जी संपादन करून राजकन्या मिळव. ज्याप्रमाणे दानवांना मदिरा देऊन देवांनी अमृत घेतले, अपार कष्ट करून कचाने संजीवनी विद्या मिळवली, त्याचप्रमाणे तू कष्ट करून महाराजांना मथुरेची ताम्रनगरी करून दे आणि स्वतःला कांता मिळव.” कमठ कुंभाराचे भाष्य ऐकून गदर्भ हसला आणि म्हणाला, “कमठा! एकूणच तुझा राजा फार बुद्धिमान असावा असं वाटत नाही. मागून मागून काय मागितले, तर तांबे! अरे, सुवर्ण, रत्नांच्या नगरीची मागणी केली असती तर क्षणात करून दिली असती. प्रती इंद्रपुरी तसेच कुबेरासमान अफाट खजिना देण्याची माझी क्षमता आहे, नव्हे तर कल्पतरू, कामधेनु आणि चौदा रत्ने सुद्धा दिली असती. असली कमी प्रतीची मागणी करायची त्याला बुद्धी झाली. याचाच अर्थ असा की दैव अनुकूल

नाही असं समजावं, त्याच्या संचितात जे असेल तेच मागण्याची त्याला बुद्धी होणार. ताम्रनगरीचे कौतुक काय कामाचे! जा! कमठा, तुझ्या राजाला सांग की तुझी मथुरा नगरी ताम्राची होईल."

कमठाने तातडीने महाराजांना जाऊन सांगितले, "महाराज! आज रात्री मथुरेचे ताम्रनगरीत रुपांतर होईल असे गदर्भाने सांगितले आहे. त्यानंतर आपण वचन दिलीप्रमाणे राजकन्या सत्यवती माझ्यकडे सुपूर्द करावी." महाराजांनी वचनाची पूर्तता होईल याची शाश्वती दिली. कमठाने घरी येऊन महाराजंचा दृढ निश्चय गदर्भाला सांगितला मग गदर्भाने विश्वकर्माला पाचारण करताच तो प्रकट झाला, हात जोडून म्हणाला, "गंधर्वराज! कशासाठी मला आपण बोलाविले आहे? काय सेवा करू आपली? हुकुम करावा." "हे महाराज विश्वकर्मा! आपण या चराचर सृष्टीचे कारागीर आहात. विश्वबांधणीच्या कामात आपल्यासारखा निष्णांत कुणीही नाही. आपणाला माझा पूर्वइतिहास माहित आहेच, माझे एक काम, जे आपल्यासाठी अगदी नगण्य आहे ते केल्यास, माझी शापातून मुक्तता होईल. ही मथूरा नगरी संपूर्णपणे ताम्रधातूची करावी. एवढी माझी मागणी पूर्ण करावी." अशी कळकळीची विनंती गदर्भाने अर्थात शापित गंधर्व सुरोचनाने केल्यावर विश्वकर्मा म्हणाला, "अवश्य! गंधर्वराज आपण निर्धास्त राहावे." असे म्हणून विश्वकर्मा यांनी आपले रचनाशास्त्र पणाला लावून सर्व नगरी तांब्याच्या धातूत रुपांतरीत केली. घरे दारे, वाडे राजवाडे, गढी, कोट, बुरुज, रस्ते, वाटा, अंगण सर्व ताम्राचे झाले. ताम्रनगरी अस्तित्वात आली. सकल नगरजन पहाटेच्या गाढ निद्रेत होते पण जाग आल्यावर प्रचंड खळबळ उडाली. सूर्याची कोवळी किरणे नगरीवर पडताच नगरी लखलखू लागली, तो लखलखाट पाहून सर्वांचे डोळे दिपले. हे काही आश्चर्यकारक आणि अघटीत घडले असल्याची नगरवासियांना जाणीव झाली आणि एकमेकांत हाच चर्चेचा विषय रंगला. मथुरानगरीचा कायापालट झाला.

महाराज सत्यवर्माही स्तिमित झाले. गदर्भाने त्यांचा शब्द खरा केला. आता वचनाप्रमाणे राजकुमारी दिली पाहिजे. परंतु स्पष्टपणे असे काही केल्यास गदर्भाला कन्या दिली म्हणून माझी घोर अपकिर्ती होईल, जग माझी हेटाळणी करेल. वचन न पाळल्यासही निंदा होईल. जग हे दोन मुखाच्या हिंस्र श्वापदासारखे आहे. दोन्ही मुखांनी विषारी गरळ ओकणार! वस्त्रे घातली तरी किंवा विवस्त्र राहिले तरी निर्भत्सना ठरलेली. जगात वागणे हे एक अवघड दिव्यच आहे. आता उत्तम मार्ग म्हणजे गुपचूपपणे कन्येला कमठाच्या घरी पाठवावी आणि त्याला दूर देशातील गावात कायमस्वरूपी वास्तव्यासाठी पाठवून देणे. काळजावर दगड ठेवून कठोर निर्णय घेतला आणि कमठाला बोलावले आणि मनातले शल्य त्याकडे व्यक्त करून म्हणाले, "आता राजकन्या सत्यवतीला तू घेऊन जा आणि गुपचूपपणे हे नगर सोडून दूरदेशात जाऊन कायमचे तेथेच वास्तव्य कर. येथील खरी ओळख आणि वस्तुस्थिती कधीच कळता कामा नये ही दक्षता घे." "जशी आज्ञा महाराज." असे आश्वासन देऊन कमठ घरी आला. घर संसाराची बांधाबांध करून गाठोडी तयार ठेवली. मावळतीच्या समयी राजवाड्यावर येऊन राजाला म्हणाला, "महाराज! माझ्या प्रस्थानाची तयारी झाली आहे." महाराजांनी विवशतेने राजकन्येला बोलाविले आणि म्हणाले, "पुत्री सत्यवती! तू माझ्या हृदयाचा तुकडा आहेस परंतु आज तुझा हा पिता हतबल होऊन तुला या कमठाबरोबर पाठवीत आहे. माझी लज्जा तुझ्या हातात आहे, मुली! मी तुला देवाला अर्पण केली आहे, असे समज! कारण ज्याने काही क्षणात मथुरा नगरी ताम्रवंती केली, तो निश्चितच देव असला पाहिजे. तू त्याचा पती म्हणून स्वीकार करावास आणि स्वतःच्या बुद्धी चातुर्याने तो नक्की कोण आहे याची परीक्षा करून त्याचे सत्यस्वरूप उघडकीस आणावे. मला विश्वास आहे की तू नकार देणार नाहीस. कारण आता कुळाचे लज्जारक्षण करणे हे फक्त तुझ्याच हातात आहे. पतीला गदर्भ समजून अव्हेर करशील तर कुळाला डाग

लागेल. शिवाय त्याने शाप दिल्यास तू किंवा मी, अथवा आपण दोघे ही शापित होऊ. तरी युक्तीयुक्तीने रहस्यभेद करून त्याला गदर्भ देहाचा त्याग करावयास लावून त्याचे मूळ स्वरूप प्रकट व्हावे असे काही कर. असे झाले तर दोन्ही कुळांचा उद्धार होईल. या कमठ कुंभाराला आपला शुभचिंतक समज आणि त्याच्याबरोबर जा." 'अवश्य पिताश्री! आपली आज्ञा शिरसावंध आहे." सत्यवती म्हणाली. रात्रीच्या गर्द काळोखात सत्यव्रत महाराज राजकुमारी सत्यवतीला घेऊन कमठाच्या घरी आले. सत्यवतीने पती आणि महाराजांनी जामात कुठे आहेत असे विचारल्यावर कमठाने खुंटीला बांधलेल्या गाढवाकडे बोट दाखविले. महाराज त्याच्यासमोर डोके टेकवून नमस्कार करीत म्हणाले, "जामातराज! माझ्या कन्येचा स्वीकार करून तिचे पालन पोषण करावे." गदर्भ मानवीवाणीत उत्तरला, "सासरेबुवा, आपण चिंता करू नये. माझ्यासारखा जावई तुम्हाला लाभला, हे तुमचे मोठे भाग्यच आहे. मी गदर्भस्वरूपात असल्यामुळे लोक निंदा करतील, उपेक्षा करतील. तथापि त्यामुळे तुम्ही दुःखी होऊ नका. मी इंद्राच्या शापाने गदर्भ कायेत रुपांतरीत झालेलो सुरोचन गंधर्व आहे." असे म्हणून त्याने सविस्तरपणे आपला पूर्वइतिहास सांगितला. ते ऐकून महाराज संतुष्ट होऊन राजवाड्यात परतले आणि मध्यरात्रीच्या अंधारात कमठ कुंभाराने पत्नीसह सत्यवती आणि गदर्भाला घेऊन मथूरेतून पलायन करून अवंतिका नगरीचा मार्ग धरला.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने शापबाधा होणार नाही तसेच पुनश्च मानवाचाच जन्म होईल. आरोग्य लाभ होईल. पतिव्रता कांता लाभून गुणी पुत्र होईल.